२०११०४१८१२१७२७००१

**विकास योजना - नाशिक**

मौजे नाशिक शिवार येथील सर्व्हे क्र. २७०(पै) मधील आरक्षण क्र. २७३ "गोठा" (भागशः) वगळून आ.क्र. २७३ अ "सार्वजनिक गृहनिर्माण" म्हणून आरक्षित करणेबाबत महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम ३७(२) अन्वयेचा फेरबदल मंजूर करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२,**
**शासन निर्णय क्र.टिपीएस-२४११/५०७/प्र.क्र.३२/११/नवि-९,**
**दिनांक : २८ मार्च, २०११**

**शासन निर्णय:** सोबतची अधिसूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द करावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(प्रदीप गोहिल)
**कार्यासन अधिकारी**

प्रति,

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
२) संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) आयुक्त, नाशिक महानगरपालिका, नाशिक.
४) जिल्हाधिकारी, नाशिक.
५) उप सचिव (नगररचना), नगर विकास विभाग, मंत्रालय मुंबई.
६) उप संचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक.
७) सहायक संचालक नगररचना, नाशिक शाखा, नाशिक.
(त्यांना विनंती की, सोबतच्या अधिसुचनेतील मंजूर फेरबदल प्रस्तावानुसार अधिप्रमाणित करण्यासाठी भाग नकाशाच्या ३ प्रती शासनास कृपया सत्वर सादर कराव्यात.)
८) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे.
(त्यांना विनंती की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात नाशिक विभागीय पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिध्द करुन त्यांच्या प्रत्येकी ०५ प्रती या विभागास व संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पाठवाव्यात.)
९) कक्ष अधिकारी, कार्यासन नवि-२९, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
(त्यांना विनंती करण्यांत येते की, सोबतची अधिसुचना विभागाच्या वेब साईटवर ठेवावी.)
१०) निवडनस्ती (कार्यासन नवि-९)

**अधिसूचना**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : २८ मार्च, २०११**

***महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६***

**क्रमांक: टिपीएस-२४११/५०७/प्र.क्र.३२/११/नवि-९**: ज्याअर्थी, नाशिक शहराची विकास योजना (भागशः) शासन नगर विकास विभाग अधिसूचना क्र. टिपीएस-११९१/३५/प्र.क्र.८८/नवि-९, दि. २८ जून, १९९३ अन्वये मंजूर झाली असून ती दि. १६ नोव्हेंबर, १९९३ पासून अंमलात आली आहे. तसेच वगळलेल्या भागाची पुनर्प्रसिद्ध विकास योजना, शासन अधिसूचना, नगर विकास विभाग क्र. टिपीएस-११९४/९४०/सीआर-४८/९४/यूडी-९, दि. १५ मे, १९९५ अन्वये मंजूर झाली असून ती दि. २९ जून, १९९५ पासून अंमलात आली आहे. (यापुढे "उक्त विकास योजना" असे संबोधले आहे) ;

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेच्या प्रस्तावानुसार मौजे नाशिक शिवार येथील सर्व्हे क्र. २७०(पै) व २७१(पै) मधील १२.७४ हेक्टर क्षेत्र आरक्षण क्र. २७३ "गोठा" म्हणून प्रस्तावित आहे. (यापुढे "उक्त आरक्षण" असे संबोधले आहे) ;

आणि ज्याअर्थी, नाशिक महानगरपालिकेने महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६ (महाराष्ट्र १९६६ चा ३७ वा) (यापुढे "उक्त अधिनियम" असे संबोधिले आहे) च्या कलम ३७ (१) मध्ये दिलेली वैधानिक पध्दत अनुसरुन उक्त आरक्षणापैकी सर्व्हे क्र. २७१(पै) मधील ०.८० हेक्टर क्षेत्र वाम्बी योजनेअंतर्गत घरकुल उभारण्यासाठी, सर्व्हे क्र. २७०(पै) मधील १.३४ हेक्टर क्षेत्र जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान अंतर्गत घरकुल योजनेसाठी व सर्व्हे क्र. २७१(पै) मधील १०.६० हेक्टर क्षेत्र यात्रा मैदानासाठी आरक्षित करण्याचा फेरबदल प्रस्ताव (यापुढे "उक्त फेरबदल प्रस्ताव" असे संबोधिले आहे) शासनाच्या मंजूरीसाठी सादर केला आहे ;

आणि ज्याअर्थी, नाशिक महानगरपालिकेने केलेला सुधारित विनंती अर्ज, आणि आवश्यक त्या चौकशीनंतर व संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेतल्यानंतर उक्त फेरबदल प्रस्तावापैकी मौजे नाशिक शिवार येथील सर्व्हे क्र. २७० (पैकी) १.३४ हेक्टर क्षेत्र आरक्षण क्र. २७३ "गोठा" या आरक्षणातून वगळून जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान अंतर्गत घरकुल योजनेसाठी दर्शवणे बाबतचा भागशः फेरबदल प्रस्ताव, नाशिक महानगरपालिकेने उक्त अधिनियमाचे कलम ३७ अन्वये प्रस्तावित केलेले अन्य फेरबदल प्रस्ताव प्रलंबित ठेवून काही अटींसह व फेरबदलासह मंजूर करणेबाबत शासनाचे मत झाले आहे ;

त्याअर्थी, आता उक्त अधिनियमाचे कलम ३७ पोटकलम (२) अन्वये व त्या अनुषंगाने असलेल्या इतर अधिकारांचा वापर करुन उक्त विकास योजनेतील उक्त फेरबदल प्रस्तावास काही अटींसह व फेरबदलासह पुढीलप्रमाणे भागशः मंजूरी देण्यात येत आहे, आणि त्यासाठी उपरोल्लिखित दि. २८ जून, १९९३ ची अधिसूचना सुधारित करण्यात येत आहे ;

विकास योजना मंजूरीच्या अधिसूचनेच्या फेरबदल सूचीतील शेवटच्या नोंदीनंतर पुढील नव्या नोंदीचा समावेश करण्यात येत आहे -

**नोंद**

"मौजे नाशिक शिवार येथील सर्व्हे क्र. २७०(पै) मधील १२७८१ चौ.मी. क्षेत्र आरक्षण क्र. २७३ "गोठा" (भागशः) मधून वगळून ते आ.क्र. २७३ अ "सार्वजनिक गृह निर्माण" म्हणून खालील अटींवर, नकाशात दर्शविल्याप्रमाणे आरक्षीत करण्यात येत आहे-

**अटी:-** १) विषयाधीन जागेतून जाणा-या हाय टेंशन लाईनच्या अनुषंगाने नाशिक महानगरपालिकेने संबंधित विभागाचा ना हरकत दाखला घेणे आवश्यक आहे.

२) मंजूर फेरबदलाखालील जागेस उत्तर बाजूने उपलब्ध असलेला कालव्याचा रस्ता हा पोच रस्ता म्हणून वापर करावयाचा असल्यास त्यासाठी नाशिक महानगरपालिकेने संबंधित विभागाचे ना हरकत प्रमाणपत्र घेणे आवश्यक राहील.

**टिप** - १) मंजूर फेरबदल दर्शविणा-या भाग नकाशाची प्रत आयुक्त, नाशिक महानगरपालिका, नाशिक यांच्या कार्यालयात, कार्यालयीन कामकाजाचे दिवशी कार्यालयीन वेळेमध्ये नागरीकांच्या अवलोकनार्थ १ महिन्याच्या कालावधीसाठी ठेवण्यात आली आहे.

२) सदर अधिसुचना विभागाच्या www.urban.maharashtra.gov.in. या वेबसाईटवर देखील उपलब्ध आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.**

(प्रदीप गोहिल)
**कार्यासन अधिकारी**

**NOTIFICATION**

**Government of Maharashtra**
**Urban Development Department**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated : 28th March, 2011**

***The Maharashtra Regional & Town Planning Act, 1966.***

**No. TPS-2411/507/CR-32/11/UD-9:-** Whereas, the Part Development Plan of Nashik City has been sanctioned vide Government in Urban Development Department's Notification No. TPS 1191/35/C.R.88/UD-9, dated 28th June, 1993 which came into force with effect from 16th November, 1993 and the Republished Development Plan of Excluded Parts is sanctioned vide Govt. in Urban Development Department's Notification No. TPS-1194/940/CR-48/94/UD-9, dated 15th May, 1995 which came into force with effect from 29th June, 1995.(hereinafter referred to as "the said Development Plan");

And whereas, in the said Development Plan, lands admeasuring 12.74 Ha. bearing Survey No. 270 (Part) & 271(Part) of Mouje Nashik Shivar is reserved as Site No. 273 "Stable" (hereinafter referred to as "the said Reservation") ;

And whereas, Nashik Municipal Corporation (hereinafter referred to as "the said Municipal Corporation") after following all the legal formalities stipulated under section 37 (1) of the Maharashtra Regional & Town Planning Act. 1966 (Maharashtra XXXVII of 1966) (hereinafter referred to as "the said Act") has submitted to Government a proposal to delete 0.80 Ha. area from Survey No. 271 (part) and to reserve it for construction of housing under WAMBAY, to delete 1.34 Ha. area from Survey No. 270 (part) and to reserve it for construction of housing under JNNURM and to delete 10.60 Ha. area from Survey No. 270 (part) and to reserve it Fair Ground (hereinafter referred to as "the said Modification Proposal") ;

And whereas, Nashik Municipal Corporation had make a revised application, and after making necessary enquiries and consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune Government is of the opinion that the part modification of Nashik Survey No. 270 "(part) Area 1.34 Ha. to be deleted from "Stable" and to be included for "Public housing", for construction of Housing under JNNURM should be sanctioned with some conditions and modification and keeping pending remaining modification proposal of Nashik Municipal Corporation ;

Now therefore, in exercise of the powers conferred under sub section (2) of the section 37 of the said Act, Govt. hereby sanctions the said Modification Proposal partly with some conditions and modification and for that purpose amends the above referred Notification dated 28th June, 1993 as follows-

- In the schedule of Modification appended in the Notification sanctioning the said Development Plan, following new entry shall be added after last entry-

**ENTRY**

"The land bearing Survey No. 270 (part) admeasuring 12781 sq. meter is deleted from Site No. 273 "Stable' (part) and land so released is reserved for "Publice Housing" Site No. 273A as shown in the plan subject to the following conditions."

**Condition –** 1) It is necessary for the Nashik Municipal Corporation to obtain the N.O.C. from concerned department regarding the High tension line passing through the land under modification.

2) It is necessary for the Nashik Municipal Corporation to obtain the N.O.C. from concerned department if the canal road available at Northern side of the land under modification is to be used as approach road.

**Note:–** (1) A copy of the part plan of aforesaid sanctioned modification is available for public inspection in the office of the Commissiner, Nashik Municipal Corporation, Nashik during office hours on all working days for the period of one month.

(2) This Notification is also available on department's web site www.urban.maharashtra.gov.in

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

(Pradeep Gohil)
**Section Officer**